आरोग्य भवन, मुंबई या इमारतीच्या स्वच्छता व सफाई व बगीचा विकसन व देखभाल सेवा पुरविण्यात आलेल्या मे. लोकभारती बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्यादित, मुंबई यांच्या प्रलंबित देयकास मान्यता देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०२३/प्र.क्र.३११/आरोग्य ३अ

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २७ मार्च, २०२४.

**वाचा :**

१) सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक-आसेआ/भां.वि/आ.भ./स्वच्छता सेवा/प्रस्ताव /न.क्र.००२भाग.२/जा.क्र.३०८/२०२३ दि. १२.०९.२०२३

२) सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक-आसेआ/आ.भ./भां.वि/मे. लोकभारती/प्र.दे/न.क्र.०२भाग.०२/जा.क्र.४४१/२०२३ दि. १२.०९.२०२३

**प्रस्तावना :**

आरोग्य भवन, मुंबई या इमारतीच्या स्वच्छता व सफाई, बगीचा विकसन व देखभाल सेवा पुरविण्याकरीता शासकीय नोंदणीकृत बेरोजगार संस्थाकडून जाहिर निविदा मागविण्यात आल्या होत्या सदर निविदांच्या अनुषंगाने न्युनत्तम दर असलेल्या मे. लोकभारती बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्यादित, मुंबई या संस्थेची/पुरवठादाराची निवड करण्यात आली होती. मे. लोकभारती बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्यादित, मुंबई या पुरठादाराच्या माहे ०१ ऑक्टोबर, २०१७ ते २८ फेब्रुवारी, २०१८ या कालावधीतील प्रलंबित देयके अदा करण्यास कार्योत्तर मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

आरोग्य भवन, मुंबई या इमारतीच्या स्वच्छता व सफाई, बगीचा विकसन व देखभाल सेवा पुरविण्याकरीता विहित पध्दतीने नियुक्त केलेल्या मे. लोकभारती बेरोजगार सेवा सहकारी संस्था मर्यादित, मुंबई या संस्थेची/पुरवठादाराची माहे ०१ ऑक्टोबर, २०१७ ते २८ फेब्रुवारी, २०१८ या कालावधीतील प्रलंबित देयके, एकूण रु.४,५९,३६०/- (अक्षरी चार लक्ष एकोणसाठ हजार तीनशे साठ फक्त) खालील अटीच्या अधिन राहून अदा करण्यास कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे. सदर देयकांचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| No. | Bill No. | Date | Period | Amount (1) (As Per Job Order) | Service Tax 12.36 | Amount (2) (As per GST) |
|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 160/17-18 | 31.10.2017 | 01.10.2017 To 31.10.2017 | 81766.00 | 10106.00 | 91872.00 |
| 2 | 161/17-18 | 30.11.2017 | 01.11.2017 To 30.11.2017 | 81766.00 | 10106.00 | 91872.00 |
| 3 | 187/17-18 | 31.12.2017 | 01.12.2017 To 31.12.2017 | 81766.00 | 10106.00 | 91872.00 |
| 4 | 211/17-18 | 31.01.2018 | 01.01.2018 To 31.01.2018 | 81766.00 | 10106.00 | 91872.00 |
| 5 | 230/17-18 | 28.02.2018 | 01.02.2018 To 28.02.2018 | 81766.00 | 10106.00 | 91872.00 |
| | | | एकूण | 4,08,830.00 | | 4,59,360.00 |

अटी व शर्ती:-

१) यापूर्वी देण्यात आलेल्या कार्यरंभ आदेशातील व करारातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदार संबंधित अधिकाऱ्याची राहील.

२) सदर प्रलंबित देयके अदा करतांना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना/शासन निर्णय/परिपत्रके/नियम यांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्याची राहील.

३) सदर देयके योग्य असल्याची तसेच प्रलंबित देयके दुबार अदा करण्यात आले नसल्याची खातरजमा करुनच अदायगी करण्यात यावी. याबाबतची जबाबदारी क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

४) पारदर्शक पध्दतीने व सर्व नियमांचे पालन करून निविदा प्रक्रिया झाल्याची खातरजमा करून देयके अदी करावीत, निविदा प्रक्रिया अंतिम केल्याच्या इतिवृताची प्रत सादर केल्याची खात्री करावी.

५) महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम क्र. १५१(१) मध्ये विहीत करण्यात आलेला नमूना साक्षांकित केल्याची खात्री करावी.

६) प्रशासकीय अधिकारी, आरोग्य भवन मुंबई कार्यालयाकडे ज्या कार्यालयांची देयके प्राप्त झाली आहेत, ती देयके जोडण्यात आली असल्याची खातरजमा करण्यात यावी.

७) सबंधित पुरवठादाराकडून उपलब्ध करून देण्यात आलेल्या सेवा योग्य प्रमाणात व चांगली असल्याची खातरजमा करूनच देयके अदा करावीत.

८) भारताचे महालेखापरीक्षकांचे व अन्य कोणत्याही लेखा परिक्षकाचा आक्षेप नसल्याची खातरजमा केल्याशिवाय देयक अदा करू नये.

२. सदर प्रस्तावावरील खर्च, मागणी क्र ,१ आर .मुख्य लेखाशिर्ष -: २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य (०९) (०१) ,संचालन व प्रशासन-००१ ,सार्वजनिक आरोग्य-०६ ,महाराष्ट्र आरोग्य सेवा विकास प्रकल्पाअंतर्गत ग्रामीणकंत्राटी -१० (४६२४ २२१०) कुटीर रूग्णालयाचे उपजिल्हा रूग्णालयामध्ये श्रेणीवर्धन/ सेवा यामधून सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३ विनियम, भाग-२ दि. १७ एप्रिल, २०१५ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग - पहिला,उपविभाग - एक मधील अनुक्रमांक ६, नियम क्र. ४० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार व त्यात नमूद अटीची पुर्तता करण्याच्या अटीच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२७१११९०१७०१७ असा आहे. आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARVIND BHIMRAO MORE

Digitally signed by ARVIND BHIMRAO MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=203af2dfba7db2a4824298a34f2c9294f93396f53d7f87cd4d69fecf5cf7005f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9246B8CCD2E2CB10707678D45EA1AD26CC1E4D7BFF7BD2AA1F253A716B8C448B, cn=ARVIND BHIMRAO MORE
Date: 2024.03.27 12:56:19 +05'30'

(अ.भि.मोरे)

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. सह संचालक, (अर्थ व प्रशासन) आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, कस्तुरी बिल्डिंग, मुंबई
५. निवडनस्ती (आरोग्य-३).